**मागास क्षेत्र अनुदान निधी, (बीआरजीएफ) या योजनेच्या पर्यवेक्षण व संनियंत्रणासाठी राज्यस्तरावर निर्माण केलेल्या प्रकल्प व्यवस्थापन कक्षातील (SPMU) पदे भरणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः बीआरजीएफ-२०१५/प्र.क्र.०९/पंरा-६**

**बांधकाम भवन इमारत, २५, मर्झबान पथ, मुंबई- ४०० ००१.**

**तारीख: २८ जानेवारी २०१५**

**वाचा -**

१) **शासन निर्णय क्रमांकः १) शासन निर्णय क्र. बीआरजीएफ-२००९/प्र.क्र.१५७/पंरा-६ दि.३१ डिसेंबर, २००९.**

२) **शासन निर्णय क्रमांकः २) शासन निर्णय क्र. बीआरजीएफ-२०११/प्र.क्र ९८/पंरा-६ दि.०८ नोव्हेंबर, २०११.**

**प्रस्तावना -**

शासन निर्णय क्रमांक- बीआरजीएफ-२००९/प्र.क्र.१५७/पंरा-६ दि. ३१ डिसेंबर, २००९ व शासन निर्णय क्र. बीआरजीएफ-२०११/प्र.क्र ९८/पंरा-६ . दि.०८ नोव्हेंबर, २०११ अन्वये मागास क्षेत्र अनुदान निधी योजनेतंर्गत प्रभावीपणे राबविण्यासाठी राज्यस्तरीय प्रकल्प व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्यात आला आहे.

योजना मागील ३ वर्षापासून राज्यामध्ये मार्गदर्शक सुचनांनुसार राबविला जात आहे. सद्यस्थिती पाहता प्रकल्प प्रभावीपणे राबविण्यासाठी मार्गदर्शक सुचनांमध्ये काही बदल करण्यात येत आहे.

मागास क्षेत्र अनुदान निधी (BRGF) या योजनेचे प्रभावीपणे पर्यवेक्षण व संनियत्रण करण्यासाठी राज्य स्तरावर निर्माण केलेल्या प्रकल्प व्यवस्थापन कक्षातील (PMU) पदे भरण्याबाबत निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्रमांकः शासन निर्णय क्र. बीआरजीएफ-२०११/प्र.क्र ९८/पंरा-६ . दि.०८ नोव्हेंबर, २०११ मध्ये खाली समाविष्ठ काही मुद्दयांचा समावेश करण्यात येत आहेत.

**शासन निर्णय:**

मागास क्षेत्र अनुदान निधी (BRGF) या योजनेचे प्रभावीपणे पर्यवेक्षण व संनियत्रण करण्यासाठी कामाचे विभागणी करण्यात येईल त्यानुसार मंत्रालयस्तरावर धोरणात्मक निर्णय व संलग्न कामे पाहीली जातील तर राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्षामार्फत (SPMU) योजनेचे अमंलबजावणीचे कामकाज पाहिले जाईल.

राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (SPMU) दिनांक ०८ नोव्हेंबर, २०११ च्या शासन निर्णयान्वये भरण्यात आलेल्या निरनिराळया संवर्गात १० पदांच्या नियुक्तीच्या पध्दतीत व पद संख्येत या शासन निर्णयान्वये खालीलप्रमाणे बद्दल करण्यात येत असुन यापुढे खालील तक्त्यामध्ये दर्शविल्यानुसार नवीन पदांच्या समावेशासह प्रकल्प व्यवस्थापन कक्षातील पदे प्रतिनियुक्ती व कंत्राटी पध्दतीने भरण्यात येतील.

| दि. ८ नोव्हेंबर, २०११ च्या शासन निर्णयान्वये मंजूर पदे | | | या शासन निर्णयान्वये मंजूर पदे (नवीन बदलासहित) | | |
|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | पदाचे नाव | मंजूर पदांची संख्या | अ. क्र. | पदाचे नाव | मंजूर पदांची संख्या |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १) | समन्वयक | १ | १) | राज्य समन्वयक | १ |
| २) | मुख्याधिकारी | १ | २) | सहाय्यक राज्य समन्वयक | १ |
| ३) | व्यवस्थापन तज्ञ | १ | ३) | वरिष्ठ लेखापाल | १ |
| ४) | सांख्यिकी सहाय्यक | २ | ४) | समाजसेवक | १ |
| ५) | वरिष्ठ लेखापाल | १ | ५) | MIS समन्वयक | १ |
| ६) | पर्यवेक्षण व संनियंत्रण तज्ञ | १ | ६) | लिपीक | १ |
| ७) | संगणक माहिती नोंदणीकार | १ | ७) | संगणक माहिती नोंदणीकार | १ |
| ८) | हार्डवेअर अभियंता | १ | | | |
| ९) | समाजसेवक | १ | | | |
| | **एकूण** | **१०** | | **एकूण** | **७** |

वरील तक्त्यात दर्शविल्यानुसार मुख्याधिकारी , व्यवस्थापन तज्ञ , सांख्यिकी सहाय्यक , पर्यवेक्षण व संनियंत्रण तज्ञ, हार्डवेअर अभियंता हे ७ मंजूर पदे रद्द करण्यात येत असुन यापुढे राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्षामध्ये (SPMU) खालील प्रमाणे दर्शविलेल्या निरनिराळ्या संवर्गातील ७ पदे शासन निर्णयान्वये प्रतिनियुक्तीने व कंत्राठी पध्दतीने भरण्यात येतील.

| या शासन निर्णयान्वये मंजूर पदे (नवीन बदलासहित) | | | | |
|---|---|---|---|---|
| अ. क्र. | पदाचे नाव | मंजूर पदांची संख्या | नियुक्तीची पध्दत | मासिक वेतन/मानधन |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १) | राज्स समन्वयक | १ | मविसे वर्ग-१ मधून प्रतिनियुक्तीने | रु.१५६००-३९१००-५४०० |
| २) | सहाय्यक राज्य समन्वयक | १ | मविसे वर्ग-२ मधून प्रतिनियुक्तीने | रु.९३००-३४८००-४२०० |
| ३) | वरिष्ठ लेखापाल | १ | प्रतिनियुक्तीने/ करार पध्दतीने | ५२००-२०२००-१९०० / २५००० पर्यंत (करार पध्दतीने) |
| ४) | समाजसेवक | १ | करार पध्दतीने | २५००० पर्यंत |
| ५) | MIS समन्वयक | १ | करार पध्दतीने | २५००० पर्यंत |
| ६) | लिपीक | १ | प्रतिनियुक्तीने/ करार पध्दतीने | ५२००-२०२००-१९०० / १५००० पर्यंत (करार पध्दतीने) |
| ५) | संगणक माहिती नोंदणीकार | १ | प्रतिनियुक्तीने/ करार पध्दतीने | ५२००-२०२००-१९०० / १५००० पर्यंत (करार पध्दतीने) |
| **एकूण** | | **७** | | |

मागास क्षेत्र अनुदान निधी या योजनेतंर्गत निर्माण केलेल्या राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्षासाठी (SPMU) असलेल्या बँक खात्याची आहरण , वितरण, नियंत्रण , लेखापरिक्षण इत्यादीबाबींची जबाबदारी उपसचिव (पंरा) व राज्य समन्वयक, राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्ष यांची राहील. मागास क्षेत्र अनुदान निधी या योजनेतंर्गत निर्माण केलेल्या राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्षासाठी (SPMU) असलेल्या बँक खात्यातून कार्यरत कर्मचारी, अधिकारी यांचे वेतन व भत्ते आणि कक्षाचे कार्यालयीन व्यवस्थापन , वाहन इ. करीता येणारा खर्च भागविण्यात यावा. शासन निर्णय क्र. बीआरजीएफ-२००९/प्र.क्र ८५/पंरा-६ . दि.१५ जानेवारी, २०१० अन्वये मुदा क्र.१३ नुसार योजनेतंर्गत प्रकल्प व्यवस्थापनासाठी असलेल्या ५% निधीतून सर्व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा हे ०.५% निधी हा राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्षाच्या (SPMU) कार्यरत असलेल्या खात्यामध्ये वर्ग करतील व त्यातून प्रशासकीय व वेतन विषयक खर्च भागविण्यात यावा. तसेच यशदा मार्फत चालणारे कामकाज पुर्वी प्रमाणेच चालू राहावे.

राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (SPMU), बीआरजीएफचे काम खालीलप्रमाणे राहिल.

१. जिल्हा नियोजन समितीचे मंजुरीने जिल्ह्याचे वार्षिक व यथार्थदर्शी आराखडे प्राप्त करुन देणे.
२. जिल्हा आराखडे प्लॅन प्लस संगणक प्रणालीमध्ये भरण्याबाबत समन्वय व संनियंत्रण करणे.
३. प्राप्त जिल्हा आराखड्यांना उच्चाधिकार समितीची मान्यता घेवून निधी प्राप्त करण्यासाठी पंचायत राज मंत्रालय, भारत सरकार यांना प्रस्ताव पाठविणे.
४. संबंधित जिल्ह्यांना दिलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे.
५. लेखा व लेखापरिक्षण विषयक उद्भवणाऱ्या बाबींची तसेच विनियोजन लेखे, राज्यवित्त व्यवस्थेवरील अहवाल, स्थानिक संस्था अहवाल, ऑडीट सर्टिफिकेट इत्यादी मधील आक्षेपांची पूर्तता करणे.
६. मागास क्षेत्र अनुदान निधी योजनेतंर्गत मंजूर आराखड्यानुसार हाती घेण्यात आलेल्या पायाभुत सुविधा/विकास कामांचा दर्जा याबाबत सातत्याने संनियंत्रण व पर्यवेक्षण करणे.
७. संबंधित जिल्ह्यांतील ग्रामपंचायतीच्या विकास अनुदानातून निर्माण झालेली मत्ता याबाबतची जिल्ह्यांची संगणकीकृत माहिती (Computerized Database) संकलित करणे, तसेच कामांना भेटी देऊन मार्गदर्शन करणे.
८. राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्षा (SPMU) मधील प्रशासकीय व आस्थापना बाबी हाताळणे.
९. केंद्र शासनासोबत संपर्कात राहुन दैनंदिन कामाचे पाठ पुरावा करणे, MIS व त्या संबधीत कामकाज पाहणे.
१०. तांत्रिक सहाय संस्थासोबत समन्वय साधणे, क्षेत्रीय अधिका-यासोबत समन्वय साधून प्रकल्प यशस्वी करणे.
११. राज्य समन्वयक, राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (SPMU) हे उप सचिव (पंरा) यांना रिपोर्ट करतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१५०१२८११३२३१७१२० असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

V Giriraj

Digitally signed by V Giriraj
DN: CN = V Giriraj, C = IN, S = Maharashtra, O = All India Service, OU = Principal Secretary
Date: 2015.01.28 15:31:07 +05'30'

( वि.गिरीराज )
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा.राज्यपाल सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३. मा.मंत्री व मा. राज्य मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव.
४. मा.विधान सभा व विधान परिषद सदस्य
५. मा. मुख्य सचिव यांचे स्वयं सहाय्यक.
६. विधान मंडळ ग्रंथालय, विधान भवन, मुंबई (१० प्रति).
७. माहिती व जनसंपर्क संचालनालय. (५ प्रति)
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
९. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा), मुंबई.
१०. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता, नागपूर.
११. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा), नागपूर.
१२. महासंचालक, यशवंत चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे.
१३. उप महासंचालक, राज्य ग्रामीण विकास संस्था, यशदा, बाणेर रोड, पुणे.
१४. सर्व मंत्रालयीन विभाग.
१५. नियोजन विभाग (कार्यासन-१४८१).
१६. सर्व मंत्रालयीन सह सचिव/उपसचिव (ग्रामविकास व जलसंधारण विभाग)
१७. सर्व विभागीय आयुक्त.
१८. सर्व जिल्हाधिकारी.
१९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व बीआरजीएफ जिल्हे).
२०. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व बीआरजीएफ जिल्हे).
२१. ग्रामविकास विभागातील सर्व कार्यासन.
२२. निवड नस्ती (कार्यासन पंरा-६), ग्रामविकास व जलसंधारण विभाग,मुंबई.